**भूसंपादन कायदा २०१३ मधील कलम ५१ प्रमाणे भूमीसंपादन, पुनर्वसन आणि पुनर्स्थापना प्राधिकरणांची स्थापना करणे व त्यासाठी एकूण १३ पदे निर्माण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. आरपीए १४१५/प्र.क्र.४५/र-१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- २० डिसेंबर, २०१६.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने "भूमीसंपादन पुनर्वसन व पुनर्स्थापना करताना वाजवी भरपाई मिळण्याचा व पारदर्शकतेचा हक्क अधिनियम २०१३" हा नवीन अधिनियम भूसंपादन व पुनर्वसन यासाठी एकत्रितपणे पारित केला आहे. सदर अधिनियम दि.०१.०१.२०१४ पासून अंमलात आलेला असून या अधिनियमातील १०९ कलमान्वये शासनाने नियम तयार केले आहेत. सदर नियम दिनांक २७.०८.२०१४ रोजी राजपत्रात प्रसिद्ध करण्यात आले आहेत. भूसंपादन व पुनर्वसनासंबंधी काही वाद निर्माण झाल्यास त्याचे त्वरित निरसन करण्यासाठी भूसंपादन अधिनियम २०१३ मधील कलम ५१ प्रमाणे भूमीसंपादन, पुनर्वसन आणि पुनर्स्थापना प्राधिकरणाची स्थापना करण्याची तरतूद आहे. त्यानुसार एक भूमी संपादन पुनर्वसन व पुर्नस्थापना प्राधिकरणाची स्थापना करणे व त्याकरीता आवश्यक कर्मचारी वर्गाची पदे निर्माण करणे, वाहन व कार्यालयीन फर्निचर खरेदी करणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

भूसंपादन "भूमीसंपादन पुनर्वसन व पुनर्स्थापना करताना वाजवी भरपाई मिळण्याचा व पारदर्शकतेचा हक्क अधिनियम २०१३" मधील कलम ५१ च्या तरतूदीस अनुसरुन भूमीसंपादनाच्या संबंधातील विवाद तातडीने निकालात काढण्याच्या प्रयोजनार्थ सर्व महसूली विभागासाठी एक भूमिसंपादन, पुनर्वसन व पुनर्स्थापना प्राधिकरणांची स्थापना करण्यास व त्याकरीता परिच्छेद २ मध्ये नमुद करण्यात आल्यानुसार एकूण १३ पदे निर्माण करण्यास या आदेशान्वये शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. राज्याच्या सर्व विभागासाठी भूमीसंपादन, पुनर्वसन आणि पुनर्स्थापना प्राधिकरणासाठी मंजूर करावयाच्या पदांचा तपशिल खालीलप्रमाणे :-

| अ.क्र | पदनाम | वेतनश्रेणी (रुपये) | प्राधिकरणांसाठी नविन पद निर्मितीच्या पदांची एकूण संख्या | एकूण वित्तियभार (रुपये लाखात) |
|---|---|---|---|---|
| १ | पिठासीन अधिकारी (जिल्हा न्यायाधिश) | ५१५००-१२३०-५८९३०-१३८०-६३०७० | ०१ | १५.०६ |
| २ | निबंधक (तहसिलदार) | १५६००-३९१०० (ग्रेड पे ५०००) | ०१ | ०७.२० |
| ३ | अव्वल कारकून | ५२००-२०२०० (ग्रेड पे २८००) | ०२ | ०७.४४ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ४ | लघूलेखक | ९३००-३४८००<br>(ग्रेड पे ४३००) | ०१ | ०६.३६ |
| ५ | लिपिक | ५२००-२०२००<br>(ग्रेड पे १९००) | ०४ | १४.०० |
| ६ | वाहन चालक | ५२००-२०२००<br>(ग्रेड पे १९००) | ०१ | ०३.५० |
| ७ | शिपाई | ४४००-७४००<br>(ग्रेड पे १३००) | ०३ | ०५.१९ |
| | **एकूण** | | **१३** | **५८.७५** |

अ) पिठासीन अधिकाऱ्याची पदे विधी व न्याय विभागाच्या सल्ल्यानुसार त्या विभागाकडून प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देण्यात यावे. तसेच उर्वरित पदे महसूल विभागाच्या आस्थापनेवरील पदांमधून प्रतिनियुक्तीने भरण्यात यावीत.

ब) पिठासीन अधिका-याची पात्रता, नियुक्ती व कार्यकाळ अधिनियमातील तरतूदीनुसार राहील.

क) प्राधिकरणाचा निबंधक हा तहसिलदार दर्जाचा असेल.

ड) सदर प्राधिकरणाच्या कार्यालयासाठी आवश्यक ती जागा संबंधित विभागीय आयुक्तांच्या कार्यालयात उपलब्ध करुन देण्यात यावी.

ई) यासाठी आवश्यक असणारा निधी मागणीचा प्रस्ताव विभागीय आयुक्तांनी शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२२२१२०५१९४११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Ramesh Hiraman Pawar

Digitally signed by Ramesh Hiraman Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=aa1f434613654b0d0749e82a6c619b857e40d5e44e1897e3d9275cd501bb5b74, cn=Ramesh Hiraman Pawar
Date: 2016.12.22 12:09:11 +05'30'

**(रमेश हि. पवार)**
**कार्यासन अधिकारी,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) मा.मुख्यमंत्री यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई - ३२.
२) सर्व मंत्री यांचे यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई - ३२.
३) सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई - ३२.
४) प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
५) सर्व मंत्रालयीन विभाग.

६) सर्व विभागीय आयुक्त.
७) सर्व उप आयुक्त (पुनर्वसन), विभागीय आयुक्त यांचे कार्यालय.
८) सर्व जिल्हाधिकारी.
९) सर्व जिल्हा पुनर्वसन अधिकारी.
१०) सर्व कार्यासने, मदत व पुनर्वसन कक्ष, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
११) निवड नस्ती, र-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.